**महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवेतील गट अ मधील उपसंचालक, आरोग्य सेवा (वेतन बँड रु. १५६००-३९१०० ग्रेड पे रु. ७६००/-) या संवर्गातील पदे जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा आरोग्य अधिकारी व विशेषज्ञ संवर्गाच्या वेतन बँड रु. १५६००-३९१०० ग्रेड पे ६६०० या वेतनश्रेणीमध्ये श्रेणी अवनत करुन भरण्याबाबत**

**महाराष्ट्रशासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पदस्था १३१४/प्र.क्र. २०८(२)/सेवा-२**
गो.ते रुग्णालय संकुल, १० वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख : २५ नोव्हेंबर, २०१४

## प्रस्तावना

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवेतील गट अ संवर्गातील उपसंचालक आरोग्य सेवा ही एकूण २३ पदे मंजूर आहेत. त्यापैकी बहुतांश पदे रिक्त असल्याने प्रशासकीय अडचणी येत आहेत. पदोन्नतीच्या कोटयातील पदे भरण्यासाठी निम्न संवर्गातील सामायिक ज्येष्ठता सूची करण्याची कार्यवाही सुरु आहे. यास्तव नियमीत पदोन्नतीने अथवा नामनिर्देशनाने पदे भरण्यास काही कालावधी लागण्याची शक्यता असल्याने क्षेत्रियस्तरावर कामकाजात अडचणी निर्माण होवू नयेत म्हणून उपसंचालक, आरोग्य सेवा (वेतन बँड रु. १५६००-३९१०० ग्रेड पे रु. ७६००/-) या संवर्गातील पदे सहायक संचालक, आरोग्य सेवा या पदाच्या वेतन बँड रु. १५६००-३९१०० ग्रेड पे.६६००/- या वेतनश्रेणीमध्ये श्रेणी अवनत करुन जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा आरोग्य अधिकारी व विशेषज्ञ संवर्गातून तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवेतील गट अ संवर्गातील उपसंचालक आरोग्य सेवा (वेतन बँड रु. १५६००-३९१०० ग्रेड पे रु. ७६००/-) या संवर्गातील पदे सहायक संचालक, आरोग्य सेवा या पदाच्या वेतन बँड रु. १५६००-३९१०० ग्रेड पे.६६००/- या वेतनश्रेणीमध्ये श्रेणी अवनत करुन जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा आरोग्य अधिकारी व विशेषज्ञ संवर्गातून तात्पुरत्या स्वरुपात भरण्याचा शासनाने निर्णय घेतलेला आहे. त्यानुसार डॉ. (श्रीमती) रत्ना दिनकर रावखंडे, सहायक संचालक, आरोग्य सेवा (वैद्यकीय), मुंबई मंडळ, ठाणे यांची पदस्थापना उपसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे या ( डॉ. कांबळे यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या) पदावर करण्यात येत आहे.

डॉ. (श्रीमती) रत्ना दिनकर रावखंडे यांना उपसंचालक आरोग्य सेवा या पदावर नियमित पदोन्नतीचा हक्क सांगता येणार नाही अथवा सेवा ज्येष्ठतेचा दावा करता येणार नाही. तसेच उपसंचालक, आरोग्य सेवा या पदाची वेतनश्रेणी मिळणार नाही.

उपरोक्त नमूद केलेली पदस्थापना ही नियमित पदोन्नती किंवा महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून उमेदवार उपलब्ध होईपर्यंत, यापैकी जे आधी घडेल त्या कालावधीपर्यंत अंमलात राहील.

डॉ. (श्रीमती) रत्ना दि. रावखंडे यांना त्यांच्या नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरीता तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे आणि संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरीत हजर होऊन त्याबाबतचा अहवाल संचालक आरोग्य सेवा, मुंबई व शासनास सादर करावा.

हा शासन निर्णय सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक 201411251305288317 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO

Digitally signed by GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO
DN: CN = GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = PUBLIC HEALTH,CID - 918117
Date: 2014.11.25 16:52:58 +05'30'

**( वि. पुं. घोडके )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) संचालक आरोग्य सेवा, मुंबई
२) सहसंचालक आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन), मुंबई
३) उपसंचालक आरोग्य सेवा (सर्व)
४) जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय (सर्व)
५) महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, (लेखा परिक्षा)/(लेखा अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर
६) जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व)
७) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे
८) डॉ. (श्रीमती) रत्ना दिनकर रावखंडे, सहायक संचालक, आरोग्य सेवा (वैद्यकीय),मुंबई
९) प्रधान सचिव (सा.आ.) यांचे स्वीय सहायक, सा. आ. वि. मंत्रालय, मुंबई
१०) निवड नस्ती (सेवा -२)